शासकीय गट-अ व ब (राजपत्रित) अधिका-यांची व गट-क व ड (अराजपत्रित) कर्मचा-यांची नियत सेवावधीपूर्वी सेवानिवृत्ती

---

वयाच्या ५०/५५ वर्षापलीकडे/अर्हताकारी सेवेच्या ३० वर्षाच्या कालावधीपुढे सेवेत राहण्याची शासकीय कर्मचा-यांची पात्र-पात्रता अजमाविण्याचा निकष

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग,**

**शासन परिपत्रक क्र. विपुस-२०१४/प्र.क्र.७५/आस्था-३,**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक:-१२ डिसेंबर, २०१४.

**संदर्भ:-** १) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरसी-१०८५/१०२९/४३/१५, दि. १२.५.८६.

२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरसी-१०८५/१०२९/४३/१५, दि. १.४.८९.

३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरसी-१०८५/१०२९/४३/१५, दि.२४.२.९३.

४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र विपुस-१०९९/प्र.क्र.५२/९९/१५, दि २१.३.२०००

५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. विपुस-२००२/प्र.क्र.१४८/२००२/१५, दि २२.९.२००३.

६) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. विपुस-१००९/प्र.क्र.७८/०९/१५, दि. २९.३.२०१०

७) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. विपुस-१००८/प्र.क्र.५/०८//१५, दि ४.८.२०१०.

**परिपत्रक:-**

महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतन ) नियम १९८२ च्या नियम १०(४) व ६५ अनुसार सार्वजनिक हितास्तव अकार्यक्षम/संशयास्पद सचोटीच्या राज्य शासकीय अधिका-यांना शासन सेवेतून मुदतपूर्व सेवानिवृत्त करण्याचे अधिकार समुचित प्राधिका-यांना (नियुक्ती प्राधिका-यांना ) आहेत. त्यादृष्टीने शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरसी-१०८५/१०२९/४३/१५, दिनांक १२.५.८६ अन्वये शासकीय अधिका-यांची सेवेत राहण्याची पात्रपात्रता अजमाविण्याचे निकष विहित करण्यात आले आहेत.

राज्यातील राजपत्रित अधिका-यांच्या तसेच अराजपत्रित कर्मचा-यांच्या एकूण संख्येचा विचार करता दरवर्षी मोठ्या संख्येने पुनर्विलोकनास पात्र होणा-या अधिकारी/कर्मचारी यांच्या पुर्विलोकनाच्या कामाचा व्याप फार मोठा असून या विभागात कार्यरत असणा-या अधिका-यांच्या संख्याही अधिक आहेत.

या कामाचा उरक वाढविण्याच्या उद्देशाने पुनर्विलोकन करण्याच्या प्रचलीत कार्यपध्दतीत सुधारणा करण्याच्या दृष्टीने सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभागातील अधिकारी/कर्मचारी यांचे पुनर्विलोकनाबाबतची कार्यवाही सुलभतेसाठी कार्यपध्दती ठरविणे आवश्यक आहे.

शासनाच्या पुनर्विलोकनविषयक धोरणानुसार सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभागाच्या नियंत्रणाखालील पुनर्विलोकनास पात्र होणा-या अधिका-यांची वयाच्या ५०/५५ वर्षापलिकडे किंवा अर्हताकरी सेवेची ३० वर्षाची सेवा झाल्यावर सेवेत पुढे चालू राहण्याची पात्रपात्रता आजमाविण्याच्या दृष्टीने खालीलप्रमाणे कार्यवाही करण्याच्या सूचना देण्यात येत आहेत.

अ) गट-अ (राजपत्रित) अधिका-यांचे नियुक्ती प्राधिकारी शासन असल्याने त्यांच्या (अधीक्षक अभियंता, कार्यकारी अभियंता व उप अभियंता) पुनर्विलोकनाबाबत शासन स्तरावर समितीची स्थापना कण्यात आली आहे. ही समिती या अधिका-यांचे ५०/५५ वर्षापलीकडे/अर्हताकारी सेवेच्या ३० वर्षाच्या कालावधीपुढे सेवेत राहण्याची शासकीय कर्मचा-यांची/अधिका-यांची पात्रता तपासून त्याप्रमाणे निर्णय घेऊन त्याबाबतचे आदेश निर्गमित करण्याची कार्यवाही करेल. मात्र`याबाबत ज्या अधिका-यांचे ५०/५५ वर्षापलीकडे/ सेवेच्या ३० वर्षाच्या कालावधीपुढे पुनर्विलोकन करावयाचे आहे, त्याबाबत प्रादेशिक विभागाने (मुख्य अभियंता कार्यालयाने) खालीलप्रमाणे माहिती पाठवावी.

| अधिका-याचे नांव | जन्म दिनांक | शारीरिक क्षमतेबाबत अभिप्राय | सचोटीबाबत अभिप्राय | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| | | | | |

ब) गट-ब च्या (राजपत्रित) अधिका-यांचे नियुक्ती प्राधिकारी शासन असले तरीही शाखा अभियंता, सहाय्यक अभियंता, श्रेणी ॥ व कनिष्ठ अभियंता (अराजपत्रित )यांचेबाबत मुख्य अभियंता यांचे अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्यात यावी. संबंधित अधिका-याचा "चांगला" पेक्षा कमी नाही असा अभिलेख, शारिरीक क्षमता व निर्विवाद सचोटी बाबतचे निकष तपासून तसेच लगतच्या मागील ५ वर्षाच्या गोपनीय अहवालांची प्रतवारी तपासून त्याबाबतचे इतिवृत्त सार्वजनिक बांधकाम विभागास सादर करावे. त्यानंतर शासनाची मान्यता घेऊन त्याबाबतचे आदेश शासन स्तरावरून निर्गमित करण्यात येतील. सदरच्या इतिवृत्तात खालील बाबींचा समावेश असणे आवश्यक आहे.

| अधिका-याचे नांव | जन्म दिनांक | शारीरिक क्षमतेबाबत अभिप्राय | सचोटीबाबत अभिप्राय | ५०/५५ वर्षामागील लगतच्या वर्षाचे गोपनीय अहवाल | | | | | शेरा पात्र / अपात्र |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| | | | | | | | | | |

क) गट- क व ड (अराजपत्रित) कर्मचा-यांबाबत संबंधित नियुक्ती प्राधिका-यांनी विभागीय पुनर्विलोकन समित्यांची स्थापना करून ५०/५५ वयाचा आढावा घेऊन योग्य ती कार्यवाही करावी.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१४१२१२१५५८५८०३१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pandit Khanderao Jadhav

Digitally signed by Pandit Khanderao Jadhav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pandit Khanderao Jadhav
Date: 2014.12.12 16:13:05 +05'30'

**(पं.खं. जाधव)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रती,**

१) मुख्य अभियंता व सह सचिव /सह सचिव (सं.नि.)उपसचिव (सेवा)/ सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२) सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,
३) सर्व अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,
४) अवर सचिव (प्रशासन)/अवर सचिव (आस्था), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५) कार्यासन अधिकारी, का.प्रशासन-२/आस्था-३,सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६) मा. मंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव,
७) सामान्य प्रशासन विभाग, (का-१५), मंत्रालय, मुंबई-३२.
८) सचिव (बांधकामे/सचिव (रस्ते) ) सार्वजनिक बांधकाम विभाग, यांचे स्वीय सहाय्यक यांना माहितीसाठी अग्रेषित